**राज्यातील वायुवेग पथकांसाठी नवीन इंटरसेप्टर वाहन खरेदी करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह (परिवहन) विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०३२३/प्र.क्र.९६/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : ०१ जून, २०२३

**वाचा :**

१) केंद्र शासन, वित्त मंत्रालयाचे प्रधान सचिव (वित्त) यांना अग्रेषित केलेले पत्र क्र. F.No.44 (1)/PF-S/(CAPEX)-Part-VIII/2022-23, दि.२३.०३.२०२३.

२) केंद्र शासन, वित्त मंत्रालयाचे अधिदान व लेखा अधिकारी, खर्च विभाग, वित्त मंत्रालय यांना अग्रेषित केलेले पत्र क्र. F.No.44 (1)/PF-S/(CAPEX)-Part-VIII/2022-23- SACE-3, दि.२४.०३.२०२३.

३) गृह (परिवहन) विभाग, शासननिर्णय क्र.एमव्हीआर ०३२१/प्र.क्र.४१/परि-२, दि.३१ मार्च,२०२३.

४) मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखालील दि.१०.०४.२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

५) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य मुंबई यांचे क्र.पआाका/वाहन खरेदी/अंमल२/का-२अ (१२) /२०२३/ जा.क्र.२४१०,दि.१७ फेब्रुवारी,२०२३ व जा.क्र.४९८०, दि.२६ एप्रिल, २०२३.

**प्रस्तावना :**

राज्यातील रस्त्यावरील अंमलबजावणी व रस्ता सुरक्षाविषयक जनजागृतीचे काम परिणामकारक होवून अपघातांना आळा घालण्यासाठी उपर्निर्दिष्ट क्र. १ व २ येथील पत्रान्वये केंद्र सरकारने Scheme for special assistance to states for capital investment in २०२२-२३ (RVSF) या योजनेतंर्गत महाराष्ट्र राज्यास Strengthening of enforcement for improving Road safety करीता रु.५७ कोटी विशेष बिन व्याजी कर्ज मंजूर केले आहे. त्यापैकी रु.३८.५० कोटी इतका निधी राज्यशासनास प्राप्त झाला आहे. सदर निधीतून गृह ( परिवहन) विभागाच्या अधिपत्याखालील वायुवेग पथकांसाठी नवीन इंटरसेप्टर वाहने आवश्यक त्या उपकरणांसह खरेदी करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. आता या प्रकरणी शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:**

गृह (परिवहन) विभागाच्या अधिपत्याखालील कार्यरत वायुवेग पथकांसाठी १८७ नवीन इंटरसेप्टर वाहने आवश्यक त्या उपकरणांसह (प्रति वाहन रु.२०.५० लाख या दराने ) खरेदी करण्यास व त्यासाठी येणाऱ्या रु.३८,३३,५०,०००/- (अक्षरी रु. अडतीस कोटी तेहतीस लक्ष पन्नास हजार फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर वाहनांची खरेदी करताना उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि.०१.१२.२०१६ व दि.२४.०८.२०१७ रोजीच्या शासन निर्णयामध्ये नमूद तरतुदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच, GeM पोर्टलवरील अटी व शर्ती नुसार खरेदी प्रक्रियेची विहित कार्यपद्धती अवलंबवावी.

३. यासाठी येणारा खर्च हा "मागणी क्र.बी-१०,(५००२ ००१४) भारतीय रेल्वे यावरील भांडवली खर्च-वाणिज्यिक मार्ग-३२ अंशदाने" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६०११७२१०००३२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LANGHI BHARAT R

Digitally signed by LANGHI BHARAT R
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, pseudonym=B2922612E606733B1ABC8BE253ADA57B2D4704C4, serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=LANGHI BHARAT R
Date: 2023.06.02 15:59:34 +05'30'

**( भरत लांघी )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री (परिवहन) यांचे अपर मुख्य सचिव
३. महालेखापाल (लेखापरीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
४. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
७. कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती (परिवहन-४).